डोंबिवली पूर्व येथील सिटी सर्व्हे क्र. ६३९७ या ३२१९.२० चौ.मी. भूखंडावर सार्वजनिक खाजगी भागीदारी (बांधा, वापरा व हस्तांतरीत करा) या तत्वावर आधुनिक कर्क रूग्णालय व सुतिकागृह विकसित करण्यास ३० वर्षे कालावधीकरीता आपुलकी हेल्थकेअर प्रा. लि. या अभिकरणास नाममात्र रू.१/- दराने जागा उपलब्ध करून देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:- कडोंम-१०२४/सं.क्र.१०९९/प्र.क्र.७५/नवि-२८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई-३२.

**दिनांक:- २० ऑगस्ट, २०२४**

**संदर्भ:-** १) आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांचे पत्र क्र. कडोंमपा/आयुक्त/पीए/२१/५४१, दि.२८.०३.२०२४.

२) कल्याण-डोंबिवली महानगरपालिका प्रशासकीय ठराव क्र. ७०२, दि.०१.०३.२०२४.

३) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. मनपा-२०२४/प्र.क्र.९२/नवि-१६, दि.०१.०८.२०२४.

**प्रस्तावना:-**

कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या हद्दीतील डोंबिवली पूर्व येथील सिटी सर्व्हे क्र. ६३९७ या ३२१९.२० चौ.मी. भूखंडावर सार्वजनिक खाजगी भागीदारी) बांधा, वापरा व हस्तांतरीत करा( या तत्वावर आधुनिक कर्क रूग्णालय व सुतिकागृह विकसित करून ३० वर्षे कालावधीकरीता परिचालन करणे, या प्रकल्पाकरीता, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम ७९ (ग) नुसार मान्यता देण्याबाबतचा, आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांचा संदर्भीय क्र. १ येथील पत्रान्वये प्रस्ताव शासनास प्राप्त झाला होता.

२. संदर्भ क्र. २ च्या दि.०१.०३.२०२४ रोजीच्या, प्रशासकीय ठराव क्र. ७०२ अन्वये, डोंबिवली पूर्व येथील सिटी सर्व्हे क्र. ६३९७ या ३२१९.२० चौ.मी. भूखंडावर सार्वजनिक खाजगी भागीदारी (बांधा, वापरा व हस्तांतरीत करा) या तत्वावर आधुनिक कर्क रूग्णालय व सुतिकागृह विकसित करून ३० वर्षे कालावधीकरीता परिचालन करणे या प्रकल्पाकरीता अपुलकी हेल्थकेअर प्रा. लि., या संस्थेस देणेकरीता कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेने प्रशासकीय मान्यता दिलेली आहे.

३. कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या हद्दीतील डोंबिवली पूर्व येथील सिटी सर्व्हे क्र. ६३९७ या ३२१९.२० चौ.मी. भूखंडावर सार्वजनिक खाजगी भागीदारी (बांधा, वापरा व हस्तांतरीत करा) या तत्वावर आधुनिक कर्क रूग्णालय व सुतिकागृह विकसित करून ३० वर्षे कालावधीकरीता परिचालन करणे या प्रकल्पाकरीता आपुलकी हेल्थकेअर प्रा. लि., या अभिकरणास, सदर जागा नाममात्र रू.१/- दराने देणेकरीता संस्थेने केलेल्या मागणीच्या अनुषंगाने, दि.०१.०३.२०२४ रोजीच्या प्रशाकीय ठरावानुसार व प्रस्तावानुसार, त्यास महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ७९(ग) मधील तरतूदीनुसार, शासन मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-:**

कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या हद्दीतील डोंबिवली पूर्व येथील सिटी सर्व्हे क्र. ६३९७ या ३२१९.२० चौ.मी. भूखंडावर सार्वजनिक खाजगी भागीदारी (बांधा, वापरा व हस्तांतरीत करा) या तत्वावर आधुनिक कर्क रूग्णालय व सुतिकागृह विकसित करून ३० वर्षे कालावधीकरीता परिचालन करणे, या प्रकल्पाकरीता आपुलकी हेल्थकेअर प्रा. लि., या अभिकरणास, सदर जागा नाममात्र रू.१/- प्रति वर्ष दराने, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ७९(ग) च्या तरतूदीनुसार, खालील अटी-शर्तीच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) महसूली दप्तरी जागेबाबत असलेल्या सर्व अटी-शर्ती या निर्णयान्वये अधिग्रहीत करण्यात येत असून, संपूर्ण अधिकार कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेस देण्यात येत आहे.

२) जागेची मालकी कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेची राहील.

३) सदर जागा आपुलकी हेल्थकेअर प्रा ,.लि .या अभिकरणास, नाममात्र रू.१/- दराने देतांना प्रचलित शासन धोरणाप्रमाणे कार्यवाही करावी.

४) डोंबिवली पूर्व येथील सिटी सर्व्हे क्र. ६३९७ या ३२१९.२० चौ.मी. भूखंडावर सार्वजनिक खाजगी भागीदारी (PPP) तत्वावर आधुनिक कर्क रूग्णालय व सुतिकागृह विकसित करून ३० वर्षे कालावधीकरीता परिचालन करणे या प्रकल्पाकरीता आपुलकी हेल्थकेअर प्रा. लि., या अभिकरणास ३० वर्षे कालावधीकरिता जागा ताब्यात घेण्यात यावी.

५) सदर संस्थेस शासनाच्या प्रचलित नियम व कायद्यानुसार लागू असणारे सर्व कर व शुल्क भरण्याची जबाबदारी “आपुलकी हेल्थकेअर प्रा. लि.” या संस्थेची राहील.

६) जर अशा कोणत्याही देय रकमा भाडेपट्टाधारकाने विहित कालमर्यादेत अदा केली नाही, तर महानगरपालिका अशा मालमत्तेचा ताबा घेईल आणि अशा सर्व देय रकमा जमीन महसुलाची धकबाकी म्हणून अथवा महानगरपालिकेच्या मालमत्ता कर वसुलीच्या कार्यपद्धतीनुसार, यापैकी जे योग्य असेल त्याप्रमाणे वसूल केल्या जातील.

७) भाडेपट्टाधारक अतिरिक्त जागेचा वापर करणार नाही किंवा अतिरिक्त बांधकाम करणार नाही, अशा प्रकारचा वापर किंवा बांधकाम आढळून आल्यास, तो अटींचा भंग मानला जाईल आणि अधिनियमातील तरतुदींनुसार महानगरपालिकेकडून भाडेपट्टाधारकास नोटीस देऊन उक्त मालमत्तेचा ताबा घेण्यासाठी योग्य कारवाई सुरू केली जाईल.

८) महानगरपालिकेच्या पूर्वपरवानगीशिवाय भाडेपट्टाधारकाने केलेला वापरातील कोणताही बदल कराराचा भंग मानला जाईल आणि महानगरपालिका भाडेपट्टा रद्द करण्याची प्रक्रिया सुरू करण्यात येईल.

९) भाडेपट्टाधारकाने त्याच्या भाडेपट्ट्याच्या संदर्भात पूर्वी केलेल्या कराराच्या कोणत्याही अटी व शर्तीचा भंग केलेला नसावा आणि भाडेपट्टाधारकास भाडेपट्ट्याचे नूतनीकरण करावयाचे असल्यास, संबंधित भाडेपट्टाधारकाने आधीच्या भाडेपट्टयाचा कालावधी किंवा करार संपण्याच्या किमान तीन महिने आधी महानगरपालिकेला लेखी कळवावे.

१०) भाडेपट्टाधारक भाडेपट्ट्याचे नूतनीकरण करण्यास इच्छुक नसल्यास, महानगरपालिका अधिनियमातील तरतुदींनुसार संबंधित भाडेपट्टाधारकास नोटीस देऊन मालमत्तेचा ताबा घेण्याची कार्यवाही सुरू करेल.

११) महानगरपालिकेच्या मान्यतेशिवाय भाडेपट्ट्याचे परस्पर हस्तांतरण केले जाणार नाही किंवा मालमत्ता तारण किंवा गहाण ठेवली जाणार नाही किंवा त्यावर त्रयस्थ पक्षाचे हितसंबंधित प्रस्थापित किंवा निर्माण करता येणार नाही. अशा प्रकारची कोणतीही कसूर आढळल्यास, महानगरपालिका आयुक्त अधिनियमातील तरतुदींनुसार किंवा निश्चित केलेल्या नियमांनुसार दंड आकारू शकेल.

१२) या नियमांखालील केलेल्या भाडेपट्टा कराराचा अधिकारांच्या नोंदीमध्ये (Record of Rights) प्रविष्ट केला जाणार नाही. तथापि, या नियमांखालील करारनामा संबंधित सक्षम प्राधिकरणाद्वारे नोंदणीकृत केला जाईल.

१३) सदरील मालमत्तेचा वापर आधुनिक कर्क रूग्णालय व सुतिकागृह प्रयोजनाकरीता मर्यादित राहिल, तथापी, याबाबत तक्रारी प्राप्त झाल्यास सदरचा नाममात्र दराने केलेला भाडेपट्टा करारनामा तात्काळ संपुष्टात आणला जाईल आणि त्याकरीता शासनाचा निर्णय अंतिम राहिल.

१४) नोंदणीकृत भाडेपट्टा कराराद्वारे महानगरपालिकेच्या मालमत्तेवर महाराष्ट्र महापालिका अधिनियमातील तरतूद तसेच स्थावर मालमत्तेचे भाडेपट्टयाव्दारे हस्तांतरण आणि भाडेपट्टयाचे नुतनीकरण नियम २०२३ अन्वये भाडेपट्टाधारकास कोणत्याही अधिकारांसह हितसंबंध, हक्क निर्माण किंवा प्रस्थापित केले जाणार नाहीत, तसेच कोणत्याही न्यायालयात महानगरपालिकेच्या मालमत्तेवर कायमस्वरूपी हक्क प्रस्थापित करण्यासाठी अधिनियम आणि नियमांचा वापर करता येणार नाही.

१५) या नियमांनुसार कार्यान्वित केलेला भाडेपट्टा विहीत मुदतीनंतर समाप्त केला जाईल. तसेच, मुदतवाढ देण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०८२०१७५५५७१४२५ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUSHILA DHONDIRAM PAWAR

Digitally signed by SUSHILA DHONDIRAM PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, 2.5.4.20=be0660f27b88fa30c14d66b8296a2c28478562c6fd9d1d360094fe11409501d5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2D78E8AB53FB3619E69D852CE1492593ABC1DCE1DF4E081AFE790194FB65C97B, cn=SUSHILA DHONDIRAM PAWAR
Date: 2024.08.20 18:11:16 +05'30'

**( सुशिला पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री महोदय यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) आयुक्त तथा प्रशासक, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका, जिल्हा-ठाणे.
३) प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) उप सचिव (नवि-२८) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) निवडनस्ती (नवि-२८).